**महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे येथे इंटरनेट सुविधेसह अद्ययावत कॉम्प्युटर लॅब करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-१५१८/प्र.क्र.५६ /संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २९ जानेवारी, २०१९

**वाचा :-**

१) महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण), पुणे यांचे पत्र क्र.मराशैसंप्रप/आय.टी/संगणक लॅब/२०१८-१९/४८२७, दिनांक १४ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण), पुणे यांच्या पुर्नरचनेनंतर नव्याने आय.टी. विभागाची निर्मिती करण्यात आली आहे. सध्या या विभागामार्फत ई-साहित्य निर्मिती, तंत्रस्नेही शिक्षक प्रशिक्षण इत्यादी उपक्रम सुरु आहेत. दर्जेदार ई-साहित्य निर्मितीसाठी अद्ययावत कॉम्प्युटर लॅब आवश्यक आहे. तसेच विद्या प्राधिकरण, पुणे येथील इतर विभागांना संबंधित विषयाशी निगडीत कामे करण्यासाठी अद्ययावत संगणक सुविधा व इंटरनेट सुरु करण्याच्या प्रस्तावास मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक २८ सप्टेंबर, २०१८ रोजी झालेली बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार अद्ययावत कॉम्प्युटर लॅब व इंटरनेट सेवा सुरु करण्यासाठीच्या रु.६२,०५,०००/- खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण,८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H ४५४ ) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०१८-१९ च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व संचालक महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण

परिषद, पुणे तथा संचालक महाराष्ट्र विद्या प्राधिकरण, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग- २ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२९१२२०३९६३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2019.01.29 13:39:09 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
कार्यासन अधिकारी**,** महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) अ.मु.स., वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२) अ.मु.स., शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्विय सहायक मंत्रालय, मुंबई.
३) प्र.स., माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८) निवडनस्ती/ संगणक.